**<u>प्रतिनियुक्तीने नियुक्ती</u>**
**श्रीमती सुचित्रा आमले पाटील, तहसिलदार**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. पदस्था-२०२४/प्र.क्र.२७/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ मार्च, २०२४

**संदर्भ** :- १) शासन आदेश क्र. निलंबन-२०२३/प्र.क्र.७८/ई-४अ, दि.१३/०९/२०२३
२) शासन आदेश क्र. पुन:स्था-२०२४/प्र.क्र.०२/ई-४, दि.०१/०३/२०२४

**शासन आदेश:-**

श्रीमती सुचित्रा आमले पाटील, तहसिलदार यांना बदलीने जिल्हा करमणूक शूल्क अधिकारी, जि.का.नाशिक येथे पदस्थापना देण्यात आली होती. श्रीमती आमले या सदर पदावर रुजू न झाल्याने त्यांनी म.ना.से. (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ चे उल्लंघन केल्यामुळे संदर्भाधीन क्र.१ येथील दि. १३.०९.२०२३ रोजीच्या शासन आदेशान्वये त्यांना निलंबित करण्यात आले होते.

२. श्रीमती आमले यांना संदर्भ क्र.२ येथील दि. ०१.०३.२०२४ रोजीच्या आदेशान्वये शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले असून त्या नियुक्तीच्या प्रतिक्षेत आहेत.

३. सबब, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे) नियम, १९८१ च्या नियम -४० मधील परिशिष्ट-२ मधील विहित अटी व शर्तींना अधीन राहून आगामी लोकसभा निवडणूक २०२४ च्या अनुषंगाने निवडणूक विषयक कामकाजाशी संबंधित रिक्त पदे भरणे आवश्यक असल्याने श्रीमती सुचित्रा आमले पाटील, तहसिलदार यांची **मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई येथील रिक्त पदावर ३ वर्षाच्या कालावधीसाठी** सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने सार्वजनिक हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

४. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून श्रीमती सुचित्रा आमले पाटील यांनी बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे.

५. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई या कार्यालयातील प्रतिनियुक्तीच्या अनुषंगाने श्रीमती सुचित्रा आमले पाटील, तहसिलदार यांच्या सेवा अपर मुख्य सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहेत.

६. श्रीमती सुचित्रा आमले पाटील, तहसिलदार यांनी पुढील सूचनांसाठी अपर मुख्य सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय , मुंबई यांचेकडे हजर व्हावे.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२४०३१५१३५३१५६११९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=d36a0a6455652c60ea76104dd537113a9ca67ab14a315b9cefc36fc9be2915f8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2024.03.15 14:02:32 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

- अपर मुख्य सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
- विभागीय आयुक्त, कोकण/नागपूर.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (विभागीय आयुक्त, नागपूर यांचेमार्फत).
- उप सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).